सन २०२३-२४ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पीय अनुदाने ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, कोसबाड हिल, जि.पालघर, यांना द्यावयाच्या अनुदानाचे वाटप मुख्य लेखाशिर्ष-२४१५०३१२. सातवा हप्ता (वेतन)

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः अनुग्रा २०२३/प्र.क्र. ३२/आस्था-१५
बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई- ४०० ००१.
दिनांक : १५ मार्च, २०२४.

वाचा :

१. शा.नि., ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्रमांक प्रशिक्षण-२०९३/प्र.क्र. ८४५/०९, दि. १७.०९.१९९३.
२. शा.नि., ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्रमांक- प्रशिक्षण ११९९/ प्र.क्र.५८१/६१, दि. २३.९.१९९८
३. शा.नि., ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्रमांक-प्रशिक्षण-२०००/ प्र.क्र.८५९/४४, दि. १२.६.२००१.
४. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांकः अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३, दि.०५.०२.२०२४ व दि.०४.०३.२०२४
५. शा.नि.ग्रा.वि.वि. अनुग्रा २०२३/प्र.क्र.३२/आस्था १५, दिनांक १९.०४.२०२३, दि.२१.०७.२०२३, दि.२१.०९.२०२३, दि.०९.११.२०२३,दि. २८.१२.२०२३ व दि.१२.०२.२०२४.

**प्रस्तावना :**

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता "मागणी क्र. एल - ३, लेखाशिर्ष, २४१५, कृषि विषयक संशोधन व शिक्षण ०१- पीक संवर्धन, १२०- इतर संस्थांना सहाय्य, (०१) ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्रांना सहायक अनुदान - (०१) (०१) ठाणे जिल्ह्यातील कोसबाड हिल येथे ग्राम सेवक प्रशिक्षण केंद्र स्थापन करणे व त्याचा दर्जा वाढविणे (अनिवार्य) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) ३६, सहायक अनुदाने (वेतन) (२४१५ ०३१२)" अंतर्गत ग्राम सेवक प्रशिक्षण केंद्र, कोसबाड हिल यांना वेतनेतरसाठी रु.८९०.०० हजार (रुपये आठ लक्ष, नव्वद हजार फक्त) व वेतनासाठी रु.३२१८.०० हजार (रुपये बत्तीस लक्ष, अठरा हजार फक्त) अशी एकुण रु.४१०८.०० हजार (रुपये एक्केचाळीस लक्ष, आठ हजार फक्त) इतकी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आलेली आहे.

तसेच सन २०२३-२४ च्या सुधारीत अर्थसंकल्पिय तरतूदीनुसार ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, कोसबाड हिल या प्रशिक्षण संस्थेस (सांकेतांक क्र. २४१५०३१२) ३१ - सहायक अनुदान (वेतनेतर) करीता रु. ६२३.०० हजार (रुपये सहा लक्ष तेवीस हजार फक्त) व ३६ - सहायक अनुदान (वेतन) करीता रु. ३२१८.०० हजार (रुपये बत्तीस लक्ष अठरा हजार फक्त) असे एकूण रु.३८४१.०० हजार (रुपये अडोतीस लक्ष एकेचाळीस हजार फक्त) इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. सदर अर्थसंकल्पिय अनुदानापैकी आतापर्यंत ६ हप्ते वितरीत करण्यात आले असून आता सुधारीत अर्थसंकल्पिय तरतूदीच्या मर्यादेत सातवा हप्ता वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>शासन निर्णय</u> :

सन २०२३-२४ या वित्तीय वर्षाकरीता ग्रामसवेक प्रशिक्षण केंद्र, कोसबाड हिल, पालघर यांना संदर्भ क्र.५ च्या शासन निर्णयान्वये आतापर्यंत खालीलप्रमाणे निधी उपलब्ध करुन देण्यात आला आहे.

(रक्कम : हजारात)

| शासन निर्णय दि.१९.०४.२०२३ पहिला हप्ता (२०%) | | शासन निर्णय दि.२१.०७.२०२३ दुसरा हप्ता (वेतन)(१४%) | शासन निर्णय दि.२१.०९.२०२३ तिसरा हप्ता (वेतन)(१४%) | शासन निर्णय दि.०९.११.२०२३ चौथा हप्ता (वेतन) (१६%) | शासन निर्णय दि.२८.१२.२०२३ पाचवा हप्ता | | शासन निर्णय दि.१२.२.२०२४ सहावा हप्ता (वेतन) (१५%) | एकुण वितरीत निधी | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| वेतनेतर | वेतन | | | | वेतनेतर (५०%) | वेतन (१६%) | | वेतनेतर | वेतन |
| १७८.०० | ६४३.६० | ४५०.५२ | ४५०.५२ | ५१४.८८ | ४४५.०० | ५१४.८८ | ४८२.७० | ६२३.०० | ३०५७.१० |

२. आता, ३६ - सहायक अनुदाने (वेतन) या उद्दीष्टाकरीता सुधारीत अर्थसंकल्पिय तरतुदीच्या मर्यादेत निधी वित्त विभागाकडून उपलब्ध करुन देण्यात आला आहे. सदर मर्यादेच्या अधिन राहून ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, कोसबाड हिल, जि.पालघर यांना ३६ - सहायक अनुदान (वेतन) या उद्दीष्टाकरिता रु.१६०.९० (रुपये एक लक्ष साठ हजार नऊशे फक्त) इतके अनुदान सातवा हप्ता म्हणून वितरित करण्यास शासन मान्यता देत आहे.

३. प्रशिक्षण केंद्राना अनुदान द्यावयाच्या कार्यपध्दतीबाबत शासन परिपत्रक क्रमांक प्रशिक्षण-११९८/प्र.क्र.५८१/६१ दि.२३ सप्टेंबर, १९९८ व शासन परिपत्रक, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक प्रशिक्षण २०००/प्र.क्र.८५९/४४, दि.१२ जून २००१ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या सूचनांच्या अनुंषगाने उपायुक्त (आस्था), कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई यांनी सदर प्रशिक्षण केंद्रास दरमहा अनुदान अदा करण्याबाबत त्वरीत कार्यवाही करावी. तसेच संदर्भ क्रमांक १ च्या शासन निर्णयातील परिच्छेद क्रमांक १२ मधील अटीनुसार केंद्रानी खर्च करावा.

४. सदर निधी वितरणाकरिता तसेच निधी ज्या बाबींकरीता मंजूर करण्यात आला आहे, त्याच बाबींवर खर्च करण्यात येईल याची काटेकोर अंमलबजावणी करण्याची जबाबदारी संबंधित उपायुक्त (आस्था), विभागीय आयुक्त कार्यालय यांची असेल. तसेच सदर निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास तात्काळ सादर करण्याची दक्षता घेण्यात यावी.

५. हा खर्च "मागणी क्र.एल ३, २४१५, कृषि विषयक संशोधन व शिक्षण ०१ पीक संवर्धन १२०, इतर संस्थांना सहाय्य, ३१ - सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) व ३६ - सहाय्यक अनुदाने (वेतन) (२४१५ ०३१२)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि तो यावर्षी लेखाशिर्षांतर्गत केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा. तसेच सदर खर्च त्याच संकेतांकाखाली खर्च पडतो आहे या बाबत ताळमेळ घालून खातरजमा करावी व विभागीय आयुक्तांनी दरमहा शासनास कळवावे. सदर लेखाशिर्षाचे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून संबधित उपायुक्त (आस्थापना) हे काम पाहतील.

६. विभागीय आयुक्त कार्यालयाने प्रशिक्षण केंद्रास अनुदान वितरीत करताना वेतन / वेतनेतर बाबीवर प्रत्यक्ष किती अनुदानाची आवश्यकता आहे याची खातरजमा करुन त्यांना आवश्यक तेवढी रक्कम उपलब्ध करुन द्यावी. उपरोक्त नमूद केलेल्या अनुदानापेक्षा जास्त अनुदान वितरीत केले जाणार नाही याची दक्षता घ्यावी. तसेच प्रशिक्षण केंद्राने वेतन / वेतनेतरकरिता दरमहा किती अनुदान आवश्यक आहे, याची पूर्वसूचना संबंधित आयुक्त कार्यालयास द्यावी. त्याप्रमाणे आयुक्त कार्यालयाने वेतन / वेतनेतरकरिता अनुदान वितरीत करावे. आवश्यक असलेल्या अनुदानाबाबत पूर्वसूचना न दिल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित केंद्राच्या प्राचार्यांची असेल.

७. या अनुदानातून संबंधित प्रशिक्षण केंद्राने केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचा अधिकार महालेखापाल, (लेखा) महाराष्ट्र-१ मुंबई आणि/किंवा महालेखापाल (लेखा) महाराष्ट्र-२ नागपूर यांना राहील व त्यांना त्यांचे हे काम योग्य तऱ्हेने पार पाडता यावे म्हणून संबंधित प्रशिक्षण केंद्र / संस्था, मदत / सुविधा पुरवतील.

८. हा शासन निर्णय दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग १, उपविभाग १ ते ५ मधील तरतूदीनुसार अनुक्रमांक ४, परि. २७ (२) नुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांचा वापर करून तसेच वित्त विभागाकडील अनौ.संदर्भ क्र.२०१/२०२४/व्यय-१५, दि.०५.०३.२०२४ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२४०३१५१७३६३८१०२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

POPAT D. DESHMUKH

Digitally signed by POPAT D. DESHMUKH
DN: cn=POPAT D. DESHMUKH, o=Rural Development Department, ou, email=P.d.deshmukh@nic.in, c=IN
Date: 2024.03.15 17:58:46 +05'30'

(पो. द. देशमुख)
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत-

१. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई (२ प्रती)
२. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, बाणेर रोड, पुणे
३. संचालक राज्य ग्रामीण विकास संस्था (यशदा), बाणेर रोड, पुणे
४. उप आयुक्त (आस्था), विभागीय आयुक्त कार्यालय, कोकण विभाग, नवी मुंबई.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, पालघर, जिल्हा पालघर
६. महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र - १, मुंबई.

७. महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर.

८. वित्त विभाग, कार्यासन क्र. अर्थ-१७/व्यय-१५

९. प्राचार्य, ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, कोसबाड हिल, जिल्हा पालघर. (२ प्रती)

१०.कार्यासन क्र. वित्त-१ व वित्त-७, ग्राम विकास विभाग

११.निवड नस्ती का.क्र. आस्था-१५, ग्राम विकास विभाग.